GR-200408271329580001-0100

पुनर्विलोकनासाठी विचारात घ्यावयाचा गोपनीय अहवालाचा कालावधी.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांकःविपुस-1097/प्र.क्र.136/97/15,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांकः- 19 जून, 1998.

**संदर्भः-** 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरसी 1076/1275/15, दिनांकः- 16 जून, 1976.
2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरसी 1085/1029/43/15, दिनांकः- 12 मे, 1986.

**परिपत्रकः-** महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, 1982 च्या नियम 10(4) व नियम 65 अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिका-यांना/कर्मचा-यांना वयाच्या 50/55 व्या वर्षी पुनर्विलोकनांती निर्णय घेऊन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे, असे शासनाचे धोरण आहे.

2. संदर्भाधीन शासन परिपत्रक, दिनांक 12 मे, 1986 नुसार वयाच्या 35 व्या वर्षापूर्वी सेवेत असलेल्या गट 'अ' व 'ब' च्या अधिका-यांचे वयाची 50 वर्षे पूर्ण होते वेळी किंवा त्यांच्या अर्हताकारी सेवेची 30 वर्षे पूर्ण होते वेळी यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी तसेच वयाच्या 35 व्या वर्षानंतर सेवेत दाखल झालेल्या अधिका-यांचे वयाच्या 55 व्या वर्षी असे एकदाच पुनर्विलोकन करण्यात येते. गट 'क' व 'ड' कर्मचा-यांच्या बाबतीत वयाच्या 55 व्या वर्षी पुनर्विलोकन करण्यात येते.

3. 'अ' व 'ब' आणि 'क' गटातील अधिका-यांना/कर्मचा-यांना अनुक्रमे वयाच्या 50/55 व्या वर्षापलिकडे सेवेत रहाण्याची पात्रापात्रता अजमाविण्यासंदर्भात करावयाच्या पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी व त्यांचे गोपनीय अहवाल "चांगल्या" पेक्षा कमी नसावेत असे निकष आहेत तर गट 'ड' मधील कर्मचा-यांना पुनर्विलोकनासाठी शारिरीक क्षमता, निर्विवाद सचोटी व सेवा अभिलेखा याबाबी विचारात घ्यावा लागतात.

4. अलिकडेच सर्वोच्च न्यायालयाने श्री.वैकुंठनाथदास विरुध्द मुख्य जिल्हा वैद्यकीय अधिकारी-2 एसएससी-299 (अआयआर 1992 एस 1020) या मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या प्रकरणी निर्णय देताना असे आदेश दिले आहेत की, "पुनर्विलोकन प्रकरणांचा विचार करताना संबंधितांचे संपूर्ण सेवा कालावधीचे गोपनीय अहवाल विचारात घेण्यात यावे. मात्र पुनर्विलोकनाच्या विचाराधीन कालावधीतील 5 वर्षांच्या गोपनीय अहवालावर भर देऊन त्याआधारे पुनर्विलोकनाचा निर्णय घ्यावा." या न्यायालयीन निर्णयातील संबंधित उताराखाली उद्धृत करण्यात आलेला असून त्याचा मराठी सारांश उता-याखाली देण्यात आलेला आहे.

34. The following principles emerge from the above discussion:

(i) An order of compulsory retirement is not a punishment. It implies no stigma, nor any suggestion of misbehaviour,

(ii) The order has to be passed by the government on forming the opinion that it is in the public interest to retire a government servant compulsorily. The order is passed on the subjective satisfaction of the Government.

(iii) Principles of natural justice have no place in the context of an order of compulsory retirement. This does not mean that judicial scrutiny is excluded altogether. While the High Court or this Court would not examine the matter as an appellate court, they may interfere if they are satisfied that the order is passed (a) mala fide or (b) that it is based on no evidence or (c) that it is arbitrary in the sense that no reasonable person would form the requisite opinion on the given material; in short, if it is found to be perverse order.

(iv) The government (or the Review Committee, as the case may be) shall have to consider the entire record of service before taking a decision in the matter - of course attaching more importance to record of and performance during the later years.

The record to be so considered would naturally include the entries in the confidential records/character rolls, both favourable and adverse. If a government servant is promoted to a higher post notwithstanding the adverse remarks, such remarks lose their, more so, if the promotion is based upon merit (selection) and not upon seniority.

(v) An order of compulsory retirement is not liable to be quashed by a court merely on the showing that while passing it, uncommunicated adverse remarks were also taken into considerat- ion. That circumstance by itself cannot be a basis for interference.

Interference is permissible only on the grounds mentioned in (iii) above. This aspect has been discussed in paras 30 to 32 above.

1. मुदतपूर्व सेवानिवृत्तीचे आदेश म्हणजे शिक्षा नव्हे, अशा सेवानिवृत्तीवरुन कोणतीही गैरवर्तणूक किंवा लांछन सूचित होत नाही.

2. शासकीय सेवकाला मुदतपूर्व सेवानिवृत्त करणे हे सार्वजनिक हितार्थ आहे. असे मत असेल आणि त्याबाबत शासनाचे समाधान झाले असेल तरच मुदतपूर्व सेवानिवृत्तीचे आदेश काढण्यात यावेत.

3. नैसर्गिक न्यायाचे तत्व मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या संदर्भात उद्भवत नाही याचा अर्थ असा नव्हे की, अशी प्रकरणे न्यायिक तपासणीतून पूर्णत: वगळलेली आहेत. न्यायालय किंवा सर्वोच्च न्यायालय अशी प्रकरणे अपिलीय न्यायालय म्हणून तपासणार नाही. मात्र मुदतपूर्व सेवानिवृत्तीचे आदेश -- (अ) असद्भावपूर्वक किंवा (ब) ते कोणत्याही पुराव्यावर आधारित नाहीत किंवा (क) ते स्वेच्छेनुसार कार्यवाही करुन काढले आहेत. असे न्यायालयास वाटल्यास न्यायालय त्यामध्ये हस्तक्षेप करु शकेल.

4. शासन किंवा पुनर्विलोकन समिती अशा प्रकरणी निर्णय घेण्यापूर्वी संपूर्ण सेवा अभिलेखाची पडताळणी करील. मात्र असे करताना अलिकडच्या वर्षातील अभिलेखास व कामकाजास जास्त महत्त्व देईल. शासकीय सेवकाच्या अभिलेखाचा विचार करताना गोपनीय अहवालातील नोंदी/चारित्र्य पट या बाबतच्या अनुकूल तसेच प्रतिकूल शे-याचा विचार करील एखाद्या शासकीय सेवकास प्रतिकूल शेरे असतांनाही ज्येष्ठतेचा विचार न करता केवळ गुणवत्तेनुसार (निवडीने) वरच्या पदावर पदोन्नती दिली असेल तर त्याला देण्यात आलेले प्रतिकूल शेरे निष्प्रभ ठरतील.

5. एखाद्या कर्मचा-याला सक्तीने सेवानिवृत्त करण्याबाबतचे आदेश संबंधितास प्रतिकूल शेरे कळविले नाहीत केवळ या कारणास्तव न्यायालय रद्द करु शकत नाही.

सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने सर्व मंत्रालयीन विभाग, विभागप्रमुख व कार्यालय प्रमुखांना असे कळविण्यात येते की, शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे वयाच्या 50/55 व्या वर्षी पुनर्विलोकन करताना वरील बाबी विचारात घेऊन निर्णय घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मीरा डफळापूरकर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहायक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
मुख्य सचिव/शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन अधिकारी/कक्ष अधिकारी,
निवड नस्ती.

पुनर्विलोकनासाठी विचारात घ्यावयाचा गोपनीय अहवालाचा कालावधी.

---

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, वि.पु.स.1097/प्र.क्र.136/97/15,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 25 सप्टेंबर, 1998.

**वाचा :-** शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. वि.पु.स. 1097/प्र.क्र.136/97/15, दिनांक 19 जून, 1998.

**शुध्दीपत्रक :-** शासकीय अधिका-यांचे/कर्मचा-यांचे पुनर्विलोकन करताना विचारात घ्यावयाचा गोपनीय अहवालाच्या कालावधी संदर्भात सामान्य प्रशासन विभाग, क्र.वि.पु.स. 1097/प्र.क्र.136/97/15, दिनांक 19 जून, 1998 अन्वये निर्गमित केलेल्या परिपत्रकातील परि.2 मध्ये "गट "क" व "ड" कर्मचा-यांच्या बाबतीत वयाच्या 55 व्या वर्षी पुनर्विलोकन करण्यात येते" असे नमूद करण्यात आले आहे त्याऐवजी "गट "क" व "ड" कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या वयाच्या 55 व्या वर्षी किंवा त्यांच्या अर्हताकारी सेवेची 30 वर्षे पूर्ण होतेवेळी यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी पुनर्विलोकन करण्यात येते" असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मीरा डफळापूरकर,
शासनाचे उप सचिव.

प्रत-

राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई,
सर्व मंत्र्यांचे स्वीय सहायक,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
मुख्य सचिव/शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन अधिकारी/कक्ष अधिकारी,
निवड नस्ती.